राज्यातील उदयोन्मुख व होतकरु कलाकरांना त्यांच्यातील कलागुणांना वाव देण्याकरिता पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीतर्फे पु. ल. कट्टा सुरू करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
शासन निर्णय क्रमांक : पुलदे-२०१८/प्र.क्र.७६/सां.का.२
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ नोव्हेंबर, २०१८.

**संदर्भ** :- (१) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थंस-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.
(२) प्रकल्प संचालक पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांचे पत्र क्र. पुलअ ०४४, दि. ११.०४.२०१८.

**प्रस्तावना :**

पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीतर्फे दरवर्षी पु.ल.देशपांडे यांच्या जयंतीनिमित्त नोव्हेंबर महिन्यात कला महोत्सव साजरा करण्यात येतो. त्याचप्रमाणे महिला दिनानिमित्त मार्च महिन्यात विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्यात येते. काही संस्थांसोबत संयुक्त विद्यमाने देखील अकादमीकडून विविध कार्यक्रम आयोजित करण्यात येतात. कलांगण येथे पु ल कट्टा सुरु करण्याबाबत सल्लागार समितीच्या बैठकीमध्ये चर्चा करण्यात आली. त्यामध्ये प्रामुख्याने उदयोन्मुख व होतकरु तरुण कलाकारांना व्यासपीठ उपलब्ध करुन देण्यासाठी दर शुक्रवारी संध्याकाळी होतकरु कलाकारांना विविध कार्यक्रम कलांगणामध्ये सादर करण्यासाठी व्यासपीठ उपलब्ध करुन देण्याबाबत ठराव घेण्यात आला. यामध्ये काव्यवाचन, पथनाट्य, एकपात्री कार्यक्रम, अभिवाचन, लोककलेचे कार्यक्रम, एकांकिका, संगीत वादन, साहित्यविषयक कार्यक्रम इ. कार्यक्रमांचा समावेश असेल. पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीमार्फत प्रस्तावित करण्यात आलेली पु.ल. कट्टा ही नाविन्यपुर्ण अभिनव योजना पु. ल. कट्टा हा अकादमीच्या कार्यक्रमाचा भाग आहे. यामुळे उद्योन्मुख, होतकरू कलाकारांच्या कलागुणांना वाव मिळणार आहे. यासाठी होणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची बाब विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :- पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीमार्फत प्रस्तावित करण्यात आलेली पु. ल. कट्टा या योजनेसाठी पहिल्या वर्षी रु. २,४५,०००/- तर त्यानंतर प्रत्येक वर्षासाठी समन्वयकाच्या मानधनासाठी रु. ५०,०००/- इतका खर्च अपेक्षित आहे. हा खर्च वर्षभरासाठी आहे. सदर खर्चास या आदेशाद्वारे शासन मान्यता देत आहे. सदर खर्चाची बिगतवारी खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | साहित्य | अंदाजित खर्च रु. |
|---|---|---|
| १. | प्रकाश योजना (Lights) किमान ४ लाईट | १०,०००/- |
| २. | ध्वनी व्यवस्था (Sound) ३ माईक, २ स्पीकर, १ मिक्सर | १,१०,०००/- |

| | | |
|---|---|---|
| ३. | खुच्र्या १०० | ६०,०००/- |
| ४. | प्रमाणपत्र छपाई (Deranging and Printing) ३०० | ५,०००/- |
| ५. | स्टेशनरी व इतर किरकोळ खर्च | १०,०००/- |
| ६. | समन्वयक मानधन | ५०,०००/- |
| | **एकूण रू.** | **२,४५,०००/-** |

**०२.** प्रस्तावित खर्च “मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती (०७) कला अकादमी (०७) (०१) पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी (२२०५ १४६३) १३, कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली रू. २,४५,००० इतकी रक्कम सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध असलेल्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यास मान्याता देण्यात येत आहे.

**०३.** सदरहू शासन वित्त विभाग, परिपत्रक, क्रमांक: अर्थंस-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२.४.२०१८ अन्वये विभागास प्राप्त प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१८१११४१५०६३२२९२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by Sawant Balasaheb Ishwar
Date: 2018.11.14 15:12:40 +05'30'

**(बाळासाहेब ईश्वर सावंत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे विशेष कार्यकारी अधिकारी, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक
३) महासंचालक, माहिती व जनसंर्पक संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (प्रसिध्दीकरीता)
४) व्यवस्थापकीय संचालक, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव मुंबई
५) उपसचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक
६) प्रकल्प संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई
७) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
८) महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा) १ महाराष्ट्र राज्य, मुंबई
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११) निवड नस्ती, सां.का.२